**पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी खर्चास मंजुरी देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-मपुवि-२०१९/प्र.क्र.११५/सां.का.२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : १३ फेब्रुवारी, २०१९.**

**वाचा :** (१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.०४.२०१८.
(२) शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं/२०१८-प्र.क्र/६९.अर्थ३-, दि २५. जानेवारी २०१९.
(३) संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र.बासंका-९०/ प्रतिचित्रण/ सुक्ष्मचित्रिकरण/ २०१८-१९/२३४८, दि.१९.०७.२०१८.

**शासन निर्णय** -

पुराभिलेख संचालनलायातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण व स्कॅनिंग करण्यासाठी अर्थसंकल्पात सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात रु.३,००,००,०००/-(अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण बाहेरील संस्थांकडून करुन घेण्याच्या अनुषंगाने निविदा प्रक्रीया राबविली आहे. आता शासन सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात पुराभिलेख संचालनालयातील अभिलेखांचे सुक्ष्मचित्रिकरण करण्यासाठी रु.१,५२,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी बावन्न लाख फक्त) इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देत आहे.

२. या बाबतचा खर्च मागणी क्र. झेडडी-२,२२०५ कला व संस्कृती, (००) १०४, पुराभिलेख, (०१) (०३) पुराभिलेख कार्यालय (२२०५ १८०१) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. प्रस्तुत प्रकरणी मुख्य छायाचित्रकार, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार मुख्य छायाचित्रकार यांनी निवेदेतील अटी व शर्तीच्या अनुषंगाने कार्यवाही करावी.

**३.** हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, भाग पहिला, उपविभाग, तीन अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२), अन्वये तसेच वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२/२०१९/व्यय-१५, दि. १६.१.२०१९ च्या अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१३१५१९४७२९२३ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2019.02.13 15:22:23 +05'30'

**(अनिस शेख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
४. मुख्य छायाचित्रकार, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा),मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती, सां.का.२.